**माजी राष्ट्रपती स्व. डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचा दिनांक १५ ऑक्टोबर हा जन्मदिवस “वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक : वाप्रेदि-२०२१/प्र.क्र.४७/भाषा-३**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-** मराठी भाषा विभाग, शासन परिपत्रक क्र.वाप्रेदि-२०१५/प्र.क्र.८९/२०१५/भाषा-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१५.

**शासन परिपत्रक -**

माजी राष्ट्रपती स्व. डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या स्मृती जतन करण्याच्या उद्देशाने दिनांक १५ ऑक्टोबर हा त्यांचा जन्मदिवस “वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करण्यात येतो. या निर्णयास अनुसरुन शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये वाचनाची प्रेरणा निर्माण करण्यासाठी व वाचनाची आवड वृध्दींगत करण्याच्या दृष्टीने यापूर्वी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. सध्याच्या कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या प्रादुर्भावामुळे प्रतिबंधात्मक उपाय म्हणून संपूर्ण देशात काही निर्बंध घालण्यात आले आहेत. या पार्श्वभूमीवर या वर्षी वाचन प्रेरणा दिन साजरा करण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे "वाचन प्रेरणा दिन" कार्यक्रम साजरा करण्याच्या दृष्टीने सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये, शासकीय संस्था/मंडळ, सार्वजनिक उपक्रम इ. कार्यालयांनी देखील विविध उपक्रमांचे आयोजन करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. ऑनलाईन कार्यक्रम/चर्चासत्रे/प्रशिक्षण ही कोविडच्या पार्श्वभूमीवर काळाची गरज आहे. ही बाब लक्षात घेता वाचन संस्कृती वाढीस लागण्याच्या दृष्टीने जास्तीत जास्त कार्यक्रम ऑनलाईन पद्धतीने करण्यात यावे.

२. जिथे प्रत्यक्षरीत्या कार्यक्रम करणे शक्य आहे तिथे केंद्र शासन/राज्य शासन यांनी आखून दिलेल्या कोविड मार्गदर्शक तत्वांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. “वाचन संस्कृती” जोपासण्यासाठी सर्वांनी आपले मित्र, कुटुंबातील सदस्य इत्यादींना किमान एक पुस्तक पीडीएफ स्वरूपात ऑनलाइन पद्धतीने पाठवून त्यांना वाचनास प्रोत्साहन द्यावे.

४. व्हॉटसॲप (WhatsApp),इंटरनेट (Internet), फेसबुक(Facebook), टिव्टर(Twitter) अशा प्रकारच्या सामाजिक प्रसार माध्यमातून वाचन संस्कृती वृध्दींगत होईल /वाचनास प्रेरणा मिळेल असे संदेश प्रसारीत करावेत.

५. मराठी वाचन संस्कृती जपण्यासाठी सर्वांनी डिजीटल माध्यमाचा जास्तीत जास्त वापर करुन मराठीतील साहित्य स्वयंस्फुर्तीने वाचकांना पाठवावे.

६. सर्व संस्थांनी सोशल मीडियावर "मराठी वाचन कट्टा ' निर्मिती करावी.

७. “वाचन संस्कृती” वाढीस लागावी तसेच विद्यार्थ्यांना मराठी भाषेशी संलग्न रोजगाराच्या संधीची माहिती या दृष्टीने रोजगारभिमुख चर्चासत्राचे आयोजन करण्यात यावे. उदा. व्यवसायिक लेखक कसे बनावे, अनुवाद कसा करावा,संहिता लेखन, गीत लेखन इत्यादी.

८. सर्व संस्थांनी आपल्या स्तरावर मराठी डिजिटल साहित्य संमेलनाचे आयोजन करावे.

९. विकीपीडीया सारख्या माध्यमावर मराठीत जास्तीत जास्त लेखन व्हावे याकरीता यासंबधीच्या कार्यशाळा आयोजीत करण्यात याव्यात.

१०.(सर्व क्षेत्रीय कार्यलये) यांनी वाचन प्रेरणा दिनाच्या औचित्याने मराठी प्रचार/प्रसार/वाचन संस्कृतीच्या विकासासाठी विविध कार्यक्रमाचे आयोजन करावे.

११.मराठी अभिजात दर्जाबाबत सर्वसामान्यांना माहिती व्हावी यासाठी सर्व क्षेत्रीय कार्यालयांनी महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळाच्या समन्वयाने विविध कार्यक्रमाचे आयोजन करावे.

सदर कार्यक्रम साजरा करताना कोविडच्या पार्श्वभूमीवर केंद्र शासन/राज्य शासन यांच्या मार्गदर्शक सूचनांचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१६१५३६५०५४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Bhagwan Gawade

Digitally signed by Milind Bhagwan Gawade
DN: CN = Milind Bhagwan Gawade, C = US, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language Department
Date: 2021.09.16 17:01:58 +05'30'

**(मिलिंद भ. गवादे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
४. मा.राज्यमंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्यकारी अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा) यांचे खाजगी सचिव, मुंबई,
७. मा.मुख्य सचिव /सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने),
१०. प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
११. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, विधान भवन, मुंबई,
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३. सर्व मंत्रालयीन विभाग,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई,
१८. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), नागपूर,

१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२१. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२२. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,

**२३.** सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,

**२४.** सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,

**२५.** निवड नस्ती / भाषा -३.